विकेंद्रित खरेदी योजना - पणन हंगाम २०१९-२० मध्ये तांदूळ (CMR) साठवणूकीसाठी महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाची (MSWC) तसेच कृषी उत्पन्न बाजार समित्यांची (APMC) गोदामे भाडेतत्वावर घेणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांकः गोदाम-२०१९ /प्र.क्र. १६९/नापु-२९**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२**
**दिनांक: २० फेब्रुवारी, २०२०**

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः खरेदी-१०१४/ प्र.क्र.१७/ नापू-२९, दिनांक १४.०१.२०१६
२) शासन निर्णय क्रमांकः खरेदी १०१९/प्र.क्र.९८ /नापु-२९, दिनांक ०९.०९.२०१९
३) शासन परिपत्रक क्रमांक: धानभ २६१९/ प्र.क्र. ११५/नापु २९, दिनांक ०८ नोव्हेंबर, २०१९

**प्रस्तावना -**

खरीप व रब्बी पणन हंगाम २०१६-१७ या दोन्ही हंगामापासून केंद्र शासनाच्या निर्देशानुसार संपूर्ण राज्यात "विकेंद्रित खरेदी योजना" (Decentralized Procurement Scheme) राबविण्याचा निर्णय शासनाने संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्यानुसार सदर योजनेची राज्यात प्रभावी अंमलबजावणी करण्यात येत आहे. यापूर्वी भारतीय अन्न महामंडळामार्फत किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेतंर्गत धानाची भरडाई करून तयार होणारा तांदूळ त्यांच्या अखत्यारीतील गोदामांत जमा केला जात होता. तथापि पणन हंगाम २०१६-१७ पासून विकेंद्रित खरेदी योजनेंतर्गत तयार होणारा तांदूळ राज्य शासनाच्या गोदामात जमा करून लक्ष्य निर्धारीत सार्वजनिक वितरण व्यवस्थेंतर्गत वितरीत करावयाचा आहे. त्यासाठी अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाकडे साठवणूकीची पुरेशी यंत्रणा उपलब्ध नसल्यामुळे शासनाच्या इतर विभागाची व महामंडळाची या कामासाठी मदत घेणे आवश्यक आहे. महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ हा सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या अधिपत्याखालील शासनाचा सार्वजनिक उपक्रम असून या सार्वजनिक उपक्रमामार्फत अन्नधान्य साठवणूकीसाठी राज्यात बहुतांश ठिकाणी गोदामांची बांधकामे करण्यात आलेली आहेत. यापूर्वी भारतीय अन्न महामंडळामार्फत खरेदी होत असतांना, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाची गोदामे भाडयाने घेतली जात होती. तरी सदर बाब विचारात घेऊन राज्य शासनाकडून खरेदी केलेला तांदूळ किंवा इतर धान्यसाठा साठवणूकीसाठी भारतीय अन्न महामंडळ आणि महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ यापैकी जे दर कमी असतील त्या दराने व कृषी उत्पन्न बाजार समिती आणि भारतीय अन्न महामंडळ यांपैकी जे दर कमी असतील त्या दराने, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाची तसेच पणन

विभागाच्या अखत्यारितील कृषी उत्पन्न बाजार समित्यांची गोदामे भाडेतत्वावर घेण्याची बाबदेखील शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

पणन हंगाम २०१९-२० मध्ये किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेखाली विकेंद्रीत खरेदी योजनेंतर्गत राज्यात विविध ठिकाणी खरेदी करण्यात आलेल्या धानाची भरडाई करुन प्राप्त होणारा तांदूळ (CMR) साठवणूकीसाठी महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाची गोदामे, भारतीय अन्न महामंडळ आणि महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ यापैकी जे दर कमी असतील त्या दराने व कृषी उत्पन्न बाजार समित्यांची गोदामे, कृषी उत्पन्न बाजार समित्या आणि भारतीय अन्न महामंडळ यांपैकी जे दर कमी असतील त्या दराने खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून भाडेतत्वावर घेण्यात यावीत :-

१. संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाकडे तसेच कृषी उत्पन्न बाजार समिती कडे किमान १५०० मे.टन इतक्या क्षमतेचे धान साठवणुकीसाठी गोदाम (सर्व सोयीयुक्त) उपलब्ध असल्याबाबत खातरजमा करावी. सदरची खातरजमा झाल्यानंतर उपलब्ध गोदामासाठी त्यांच्याकडे आरक्षण प्रस्ताव सादर करावा.

२. भाडेतत्वावर घेतलेल्या सदर गोदामातील साठयाच्या विमा, किड प्रतिबंधात्मक उपाययोजना, सुरक्षा, आवक-जावकच्या नोंदी ठेवणे इ.बाबतची संपूर्ण जबाबदारी त्या संस्थांची राहील.

(अ) कृषी उत्पन्न बाजार समित्यांची गोदामे भाड्याने घेण्यापूर्वी ते सुस्थितीत असल्याचे व देय भाडयाबाबतचे प्रमाणपत्र सार्वजनिक बांधकाम विभागाकडून घेण्यात यावे. सार्वजनिक बांधकाम विभागाचे दर किंवा तात्पुरत्या अनुषंगिक खर्चाच्या दरपत्रकाचे दर (Provisional Cost Sheet) यापैकी जे कमी असतील त्याच दराने करारनामा करण्यात यावा. तसेच केंद्रीय वखार महामंडळ, राज्य वखार महामंडळ यांच्या प्रचलित अटी शर्ती नूसार गोदामातील साठ्याचा विमा, किड प्रतिबंधक उपाययोजना, सुरक्षा आवक-जावक नोंदी, वजन काटा उपलब्धता इत्यादीची जबाबदारी संबंधित संस्थेची राहील.

३. भाडेतत्वावर घेतलेल्या गोदामामध्ये माल साठवणूक करण्यापूर्वी मालाची गुणवत्ता विभागाने नियुक्त केलेल्या गुणवत्ता नियंत्रकाकडून (Q.C.) प्रमाणित करण्यात येईल व त्याबाबतचे प्रमाणपत्र सदर संस्थेस देण्यात येईल.

४. गुणवत्ता नियंत्रकाकडून (Q.C.) धान्य स्वीकृत झाल्यानंतर, गोदामामध्ये धान्य स्विकारताना सदर धान्याचे प्रत्यक्ष वजन करुन विहित आर्द्रतेची खात्री करुन तपासाअंती गोदाम प्रमुख व जिल्हा पुरवठा अधिकारी यांचे प्रतिनिधी यांच्या संयुक्त स्वाक्षरीने नोंद केली जाईल. सदरच्या नोंदी त्यापुढील सर्व प्रयोजनांसाठी ग्राहय धरण्यात येतील.

५. राज्य शासनाकडून खरेदी करण्यात आलेल्या धानापासून प्राप्त झालेला तांदूळ साठवणूकीसाठी गोदामात आवक झाल्यानंतर गोदाम मालक संस्थेच्या गोदामपालाकडून संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्याकडे आवकीच्या दिनांकापासून ४८ तासांत आवकीचा तपशील सादर करणे बंधनकारक राहील. तसेच त्याची नोंद संगणकीय प्रणालीवर करणे बंधनकारक राहील.

६. साठवणूक केलेल्या धान्याची जावक देताना सदर धान्याचे प्रत्यक्ष वजन करुन विहित आर्द्रतेची खात्री करुन त्याची जिल्हा पुरवठा अधिकारी यांचे प्रतिनिधी व गोदाम मालक संस्थेचे संबंधीत केंद्र प्रमुख यांच्या संयुक्त स्वाक्षरीने नोंद करण्यात येईल.

७. राज्य शासनाकडून साठवणूक करण्यात आलेल्या तांदूळ साठवणूकीसाठी धान्याची जावक झाल्यानंतर गोदाममालक संस्थेच्या संबंधीत केंद्र प्रमुख यांच्याकडून संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्याकडे जावकीच्या दिनांकापासून तपशील ४८ तासांत सादर करणे बंधनकारक राहील. तसेच जावकीची नोंददेखील संगणकीय प्रणालीवर करणे बंधनकारक राहील.

८. राज्य शासनाकडून खरेदी करण्यात आलेल्या तांदूळ किंवा इतर धान्याच्या साठवणूकीच्या आरक्षणापोटी झालेल्या आवक व जावकची माहिती गोदाम मालक संस्थेच्या संबंधित केंद्र प्रमुख यांच्याकडून संबंधीत जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्याकडे दर महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करणे आवश्यक राहील.

९. तांदूळाच्या साठवणूकीसाठी आरक्षित केलेल्या गोदामांच्या भाडयाची रक्कम विहित केलेल्या दरानुसार गोदाम मालक संस्थेस अदा केली जाईल.

१०. गोदाम मालक/संस्थेस गोदाम भाडयाच्या देय रकमा शासन स्तरावरुन वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा, मुंबई कार्यालयामार्फत गोदाम मालक संस्थेस अदा करण्यात येतील. सदर रक्कमांची केंद्र शासनाकडे दावे सादर करुन प्रतिपूर्ती करुन घेण्यात येईल.

११. केंद्रीय वखार अधिनियम, १९६२ व महाराष्ट्र वखार अधिनियमातील तरतूदींनुसार महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ राज्यभर केवळ साठवणूकीचे व्यवस्थापन करीत असल्याने अन्नधान्य वितरण व्यवस्थेसाठी निश्चित केलेल्या मॅन्युअल्सचा वापर करणे महामंडळावर बंधनकारक नाही. तसेच, महामंडळाची स्वत:ची व्यवस्थापन कार्यपध्दती निश्चित असल्याने विभागाचे विविध मॅन्युअलस मध्ये दिलेले निर्देश महामंडळावर बंधनकारक राहणार नाहीत.

१२. **<u>हाताळणूक / हमालीखर्च:-</u>**

भाडेतत्वावर घेण्यात आलेल्य गोदामात, गोदाम मालक संस्थेने विहीत प्रक्रीयेचा अवलंब करुन “ई” टेंडरद्वारे नियुक्त केलेल्या हमाल ठेकेदाराची देयके वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई या कार्यालयात सादर करावीत. त्याचे प्रदान वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई या कार्यालयामार्फत करण्यात येईल. सदर देयके सादर करताना साठा नोंदवहीच्या साक्षांकित प्रती, Stacking व Loading चे दर, हमाली खर्चाबाबतचा करारनामा, हमालकंत्राटदाराची/संस्थेची मागणी, दुबार मागणी नसल्याचे जिल्हा पुरवठा अधिकारी यांचे प्रमाणपत्र इत्यादी कागदपत्रांसह जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्या मार्फत व त्यांच्या शिफारसीसह देयक वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई या कार्यालयास सादर करावेत.

१३. **साठवणूक कालावधी:-**

(अ). केंद्र शासनाने तांदूळ (सीएमआर) साठी खालीलप्रमाणे साठवणूक कालावधी निश्चित केलेला आहे व त्याचे तात्पुरते दर मंजूर करण्यात आले आहेत.

| अ.क्र. | धान्य | साठवणूक कालावधी |
|---|---|---|
| १. | तांदूळ (सीएमआर) | २ महीने |

उपरोक्त प्रमाणे साठवणूक कालावधी निश्चित असल्यामुळे गोदामामध्ये जमा होणारे, तांदूळ (सीएमआर) यांचे वेळीच उचल करुन त्याचे वाटप करण्याची जबाबदारी जिल्हा पुरवठा यांची राहील. तांदूळ (सीएमआर) ची नमूद कालावधीपेक्षा जास्त कालावधीसाठी साठवणूक होणार नाही, याची जबाबदारी संबंधीत जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी यांची राहील.

भाडेतत्वावर घेण्यात आलेल्या गोदामाची देयके, वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई या कार्यालयात सादर करावीत. त्याचे प्रदान विसउस कार्यालयामार्फत करण्यात येईल. सदर देयके सादर करताना गोदाम भाडयाचा करारनामा, साठा नोंदवहीच्या साक्षांकित प्रती, गोदामातील साठयाकरीता प्रमाणपत्र, गोदाम मालकाचे देयक, दुबार मागणी नसल्याचे जिल्हा पुरवठा अधिकारी यांचे प्रमाणपत्र इत्यादी कागदपत्रांसह जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्या मार्फत व त्याच्या शिफारशीसह देयक वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई या कार्यालयास सादर करावेत.

**(ब). तूट/घटीबाबत:-**

साठवणूकी दरम्यान केंद्रशासनाने मंजूर केलेल्या कॉस्टशीट नूसार उपरोक्त कालावधीकरीता अनुज्ञेय असलेली तूट मंजूर करुन उर्वरीत तूटीबाबत त्या हंगामसाठी केंद्रशासनाने मंजूर केलेल्या कॉस्टशीट मधील सीएमआर च्या इकॉनॉमिक दराच्या सव्वापटीने वसुली करण्यात यावी.

**१४.** गोदाम मालक संस्थेच्या संबंधित केंद्र प्रमुखांकडून संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्याकडे साठवणूक तूटीची प्रकरणे निर्लेखनासाठी प्रत्येक महिन्याच्या ७ तारखेपर्यंत अथवा त्या दिवशी सार्वजनिक सुट्टी असल्यास कार्यालयीन कामकाजाच्या दिवशी सादर करणे बंधनकारक राहिल. जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी ३ महिन्याच्या आत वर नमूद परिच्छेद १३ (ब) नुसार, तूटीची प्रकरणे वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई या कार्यालयास सादर करावी.

१५. तूट निर्लेखनाची सर्व प्रकरणे निकाली काढण्यासाठी अधिकतम १ वर्षाचे बंधन असेल. जर अशा प्रकरणात १ वर्षाच्या आत निर्णय घेण्यात आला नाही, तर सदर प्रकरणी तूट आली नाही, असे समजून महाराष्ट्र राज्य वखार महामंडळास रकमा अदा केल्या जातील आणि विलंबास जबाबदार असलेल्या संबंधित अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करुन कायदेशीर कारवाई प्रस्तावित करण्यात येईल.

१६. अन्नधान्य वितरण व्यवस्थेतील तुटीच्या प्रकरणांसाठी किंवा तूट पोटीच्या निर्लेखनासाठी शासनाने निर्गमित केलेले आदेश गोदाम मालक संस्थेस साठवणूकीसाठी ठेवलेल्या इतर अन्नधान्याच्या साठयासाठी लागू राहणार नाहीत.

१७. राज्य शासनाकडून खरेदी केल्या जाणाऱ्या धानापासून तयार होणारा तांदूळ महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या गोदामांतील साठवणूकीबाबत सदर सर्व अटींचा अंतर्भाव असलेला करारनामा राज्य शासनाच्या वतीने जिल्हा पुरवठा अधिकारी/अन्नधान्य वितरण अधिकारी व गोदाम मालक संस्थेच्या वतीने अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, गोदाम मालक संस्था यांच्या अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्याच्या स्वाक्षरीने करण्यात येईल. सदरचा कारारनामा संपुष्टात आणण्यासाठी राज्य शासन किंवा गोदाम मालक संस्था यांनी ३ महिन्याची पूर्वसूचना (नोटीस) देणे संबंधितांवर बंधनकारक राहील.

१८. वरील शासन निर्णयानुसार पणन हंगाम २०१९-२० या हंगामातील धान्याच्या साठवणुकीकरिता गोदाम भाडयापोटी गोदाम मालक संस्थेस देय रक्कम विभागाचे वित्तीय सल्लागार व उप सचिव यांचे स्तरावरुन वेळचे वेळी अदा केल्या जातील. सदरचा खर्च " मागणी क.एम्-४, ४४०८- अन्न साठवण व वखार साठवण यांवरील भांडवली खर्च, ०१-अन्न १०१ प्रापण व पुरवठा ०२-प्रापण वितरण व किंमत नियंत्रण (०२) (०६) मुंबई शहर अन्नधान्य खरेदीवरील अनुषंगिक खर्च (४४०८ ०३९१) ५०- इतर खर्च "या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२०१३१७२८०७०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Satish
Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food and Civil Supply, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, serialNumber=ae91c22a99adbafeb91e1127b17cef54d9c48672dc90ac9562ba7f619961cbbb, cn=Satish Shridhar Supe
Date: 2020.02.20 13:24:30 +05'30'

**(सतिश सुपे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,कनमुर हाऊस, मुंबई
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या, आदिवासी विकास भवन,जुना आग्रा रोड, नाशिक - ४२२ ००१.
३) जिल्हाधिकारी, नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली, ठाणे,पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग.
४) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा मुंबई.
५) जिल्हा पुरवठा अधिकारी,नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली,

ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग.

६) सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी,नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली, ठाणे,पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग.

७) सर व्यवस्थापक (महाराष्ट्र) ,भारतीय अन्न महामंडळ, ५ वा माळा, दत्तपाडा रोड, राजेंद्र नगर, बोरीवली (पूर्व), मुंबई-४०००६६

८) उपआयुक्त (पुरवठा), सर्व विभाग.

<u>**प्रत माहितीसाठी अग्रेषित :-**</u>

१) मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधान परिषद

२) सर्व विधान परिषद सदस्य व विधान सभा सदस्य.

३) अपर मुख्य सचिव, (पणन), सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

५) प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती),

७) खाजगी सचिव, मा.मंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण), मंत्रालय, मुंबई-३२.

८) मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये, (प्रत्येकी ५ प्रती),

९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय ६ वा मजला, विधानभवन, मुंबई. (१० प्रती)

१०) संचालक, दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन, मुंबई

११) संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक